**नमो दिव्यांग शक्ती अभियानाअंतर्गत दिव्यांग पुनवर्सन केंद्र घोषित करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**दिव्यांग कल्याण विभाग**
**शासन निर्णय क्रमांक:-दिव्यांग-२०२३/प्र.क्र.१६६/दिव्यांग कल्याण-२.**
३१,३२,३५ "ए" विंग, तिसरा मजला, मित्तल टॉवर
बॅरिस्टर रजनी पटेल मार्ग, नरिमन पॉईंट,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०२१.
**दिनांक :- ०९ मे, २०२५.**

**संदर्भ :-**
१. दिव्यांग व्यक्ती हक्क अधिनियम, २०१६.
२. केंद्र शासन मार्गदर्शक सूचना, दिनांक ०१ एप्रिल, २०२३
३. सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग शासन निर्णय क्र.अपंग- २०१३/ प्र.क्र.२०१/अ.क.२, दिनांक २० फेब्रुवारी, २०१९
४. मुख्य सचिव यांचे कार्यालयाचे क्र. मुसका/ई-६२५१७९५/२०२३/का.१, दिनांक ०३ ऑक्टोबर, २०२३ चे पत्र.
५. दिव्यांग कल्याण विभागाचा समक्रमांकाचा शासन निर्णय, दिनांक २८ नोव्हेंबर,२०२३, दि. ३० जानेवारी, २०२५ आणि दि. १६ एप्रिल, २०२५
६. आयुक्त, दिव्यांग कल्याण आयुक्तालय, पुणे यांचे पत्र क्र. दिकआ/प्र-७/नमो दिव्यांग शक्ती अभि./दिव्यांग पुनर्वसन केंद्र/२०२५-२६ पुणे, दिनांक २८ एप्रिल, २०२५.

**प्रस्तावना :-**

देशाचे मा. पंतप्रधान महोदय यांच्या ७३ व्या वाढदिवसानिमित्त विविध लोकोपयोगी उपक्रमांचा समावेश असलेला नमो ११ सूत्री कार्यक्रम शासनाने दिनांक ०३ ऑक्टोबर, २०२३ च्या पत्रान्वये राज्यात राबविण्याचा निर्णय घेतला आहे. त्यानुसार **"नमो दिव्यांग शक्ती अभियान"** अंतर्गत ७३ दिव्यांग पुनर्वसन केंद्रे सुरु करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता. सदर विशेष अभियानास "नमो दिव्यांग शक्ती अभियान" असे संबोधण्यात येणार आहे. याबाबत शासनाने विभागाच्या संदर्भ क्र.५ येथील दिनांक २८ नोव्हेंबर, २०२३ रोजीच्या शासन निर्णयान्वये नमो दिव्यांग शक्ती अभियानांतर्गत २१ दिव्यांग पुनर्वसन केंद्रे, दिनांक ३० जानेवारी, २०२५ रोजीच्या शासन निर्णयान्वये २९ आणि दिनांक १६ एप्रिल, २०२५ रोजीच्या शासन निर्णयान्वये ०८ असे अद्यापपर्यंत एकूण ५८ दिव्यांग पुनर्वसन केंद्रे घोषित केले आहेत. सबब आयुक्त, दिव्यांग कल्याण आयुक्तालय, पुणे यांच्या संदर्भाधीन क्र. ६ येथील पत्रान्वये प्राप्त झालेल्या प्रस्तावास अनुसरून जिल्हा दिव्यांग पुनर्वसन केंद्रांमधून नमो दिव्यांग शक्ती अभियानांतर्गत उर्वरित दिव्यांग पुनर्वसन केंद्र घोषित करणेची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

**“नमो दिव्यांग शक्ती अभियान”** अंतर्गत राज्यातील दिव्यांग व्यक्तींना आवश्यक त्या सोयी-सुविधा व मदत उपलब्ध करून देण्यासाठी प्रत्येक जिल्ह्यात दोन याप्रमाणे ७२ आणि मुंबई शहर व मुंबई उपनगर साठी अतिरिक्त एक अशी एकूण ७३ दिव्यांग पुनर्वसन केंद्रांपैकी अद्यापपर्यंत ५८ दिव्यांग पुनर्वसन केंद्रे विशेष अभियानांतर्गत सुरू करण्यात आली आहेत.

२. उर्वरित दिव्यांग पुनर्वसन केंद्र घोषित करण्यासाठी संदर्भ क्र. ६ येथील दिव्यांग कल्याण आयुक्तालयाकडून प्राप्त प्रस्तावांमधून राज्यातील दिव्यांगांसाठी राज्यातील कार्यरत असलेल्या स्वयंसेवी संस्था व जिल्हा दिव्यांग पुनर्वसन केंद्रे यामधून खालील तक्त्यात नमूद केलेल्या **०३** जिल्हा पुनर्वसन केंद्रांना नमो दिव्यांग शक्ती अभियानाअंतर्गत नमो दिव्यांग पुनर्वसन गृह घोषित करण्यात येत आहे:-

| **अ.क्र.** | **जिल्हा** | **संस्थेचे नाव व पत्ता** |
|---|---|---|
| १. | पालघर | महात्मा गांधी सेवा संघ, मु. पो. अपंग कल्याणकारी संस्था, प्रशासकीय कार्यालय, १८ अल मदिना बिजनेस हब, जि.प. शाळेसमोर, सुभाष लेन, अर्नाळा, ता. वसई, जि पालघर |
| २. | कोल्हापूर | इंडियन एज्यूकेशन सोसायटी, कोल्हापूर संचलित अंकूर मतिमंद मुलांची कार्यशाळा व पुनर्वसन केंद्र (निवासी), ठिकपुली- घोटावडे रोड, परिते, ता करवीर, जि. कोल्हापूर |
| ३. | परभणी | परभणी जिल्हा दिव्यांग क्रिडा असोसिएशन, सावतानगर, वालूर रोड, सेलू, जि. परभणी |

३. जिल्हा दिव्यांग पुनर्वसन केंद्रासाठी संस्थेची निवड करण्याची कार्यपद्धती व निकष विभागाच्या संदर्भ क्र. ५ येथील दिनांक २८ नोव्हेंबर, २०२३ रोजीच्या शासन निर्णयाप्रमाणे असतील.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आलेला असून त्याचा संगणक संकेतांक क्रमांक २०२५०५०९१३३३५२०३९२३५ आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

RAJESH BHASKAR GAIKWAD

Digitally signed by RAJESH BHASKAR GAIKWAD
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PERSONS WITH DISABILITIES WELFARE DEPARTMENT, 2.5.4.20=5b1378a498cdff3fdd9ea5370b71fae3eca97e85924d0e443758ade5f0221f9a, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=26E171EC96C63F6333217D12FB6DA1C5A800CE18A7A6FD59ABF19B8ED3F02A91, cn=RAJESH BHASKAR GAIKWAD
Date: 2025.05.09 13:35:35 +05'30'

**( रा. भा. गायकवाड )**
**अवर सचिव , महाराष्ट्र शासन**

प्रति

१) मा. राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मलबार हिल,मुंबई.

२) मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय मुंबई.
३) मा. उपमुख्यमंत्री (गृह विभाग) यांचे सचिव, मंत्रालय मुंबई.
४) मा. उपमुख्यमंत्री ( वित्त विभाग व नियोजन विभाग) यांचे सचिव, मंत्रालय मुंबई.
५) मा. विरोधी पक्ष नेता, विधानसभा/विधान परिषद, विधानमंडळ, मुंबई.
६) मा.विधानसभा/विधान परिषद सर्व सदस्य, विधानमंडळ सचिवालय, मुंबई
७) मा. मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.
८) अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव, सर्व मंत्रालयीन विभाग, मुंबई
९) आयुक्त, दिव्यांग कल्याण, आयुक्तालय, पुणे
१०) सर्व जिल्हाधिकारी, जिल्हाधिकारी कार्यालय
११) सर्व आयुक्त, महानगरपालिका
१२) सर्व प्रादेशिक उपायुक्त, समाज कल्याण कार्यालय,
१३) सहाय्यक आयुक्त, मुंबई शहर / मुंबई उप नगर.
१४) सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद
१५) सर्व समाज कल्याण अधिकारी,जिल्हा परिषद
१६) भारतीय जनता पार्टी,महाराष्ट्र प्रदेश, सी.डी.ओ.बॅरेक नं.१,योगक्षेमसमोर, वसंतराव नाईक चौक, नरिमन पॉईन्ट, मुंबई ४०० ०२१,
१७) इंडियन नॅशनल काँग्रेस, महाराष्ट्र प्रदेश, काँग्रेस (आय) समिती, टिळक भवन, काकासाहेब गाडगीळ मार्ग, दादर, मुंबई ४०० ०२५,
१८) राष्ट्रवादी काँग्रेस पार्टी, राष्ट्रपती भवन, फ्री प्रेस जर्नल मार्ग,नरिमन पॉईन्ट,मुंबई ४०००२१,
१९) शिवसेना, शिवसेना भवन, गडकरी चौक, दादर, मुंबई ४०० ०२८,
२०) बहुजन समाज पार्टी, महाराष्ट्र कमिटी, जनशक्ती हॉल, ग्लोब मिल पॅलेस, वरळी,मुंबई ४०००१३,
२१) भारतीय कम्युनिस्ट पार्टी,महाराष्ट्र कमिटी जनशक्ती हॉल, ग्लोब मिल पॅलेस,वरळी, मुंबई
२२) भारतीय कम्युनिस्ट (मार्क्सवादी) पार्टी, महाराष्ट्र कमिटी, जनशक्ती हॉल, ग्लोब मिल पॅलेस, वरळी, मुंबई
२३) महाराष्ट्र नवनिर्माण सेना, राजगड, मातोश्री टॉवर, शिवाजी पार्क, दादर, मुंबई - ४०० ०२८,
२४) निवड नस्ती/दिव्यांग कल्याण-२.